**नगरपरिषद / नगरपंचायत राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्यांबाबतचे धोरण निश्चित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.११९/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ११ मे, २०१७

<u>वाचा :-</u>

१. शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-१२०३/१४६/प्र.क्र.१७५/०३/नवि-१४, दि.११.०१.२००७

२. शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-१००८/३६५/प्र.क्र.७६/०८/नवि-१४, दि.२८ जानेवारी, २०१०.

३.शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.६९/नवि-१४, दि.०७.०३.२०१७

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील नगरपरिषदेमधील दैनंदिन काम व विकास कांमाचे सुसूत्रीकरण व्हावे, त्यांच्या सेवा शती, वेतनश्रेणी यांच्यात समानता असावी व विहित शैक्षणिक अर्हता पात्र जबाबदार अधिकारी नगरपरिषद प्रशासनास उपलब्ध व्हावेत म्हणून शासनाने उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दि.११.०१.२००७ च्या शासन निर्णयान्वये एकूण ६ महाराष्ट्र नगरपरिषद कर्मचारी राज्यस्तरीय संवर्ग स्थापन केलेले आहेत. सदर आदेशामध्ये राज्यस्तरीय संवर्गातील पदांकरीता आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

तद्नंतर संदर्भ क्र.२ येथील शासन अधिसूचना, दि.२८.०१.२०१० अन्वये उपरोक्त शासन अधिसूचना, दि.११.०१.२००७ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार, राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांच्याबाबतीत श्रेणीनुसार पुढीलप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी निश्चित करण्यात आले आहेत :-

- श्रेणी अ साठी - संचालक, नगरपरिषद प्रशासन
- श्रेणी ब साठी - प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन; आणि
- श्रेणी क साठी - जिल्हाधिकारी

आता,संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, दि.०७.०३.२०१७ अन्वये राज्यस्तरीय संवर्गातील पदांकरीता आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने, शासन निर्णय, दि.१४.०१.२००७ व दि.२८.०१.२०१० अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या नियमांमध्ये अनुषंगिक सुधारणा करण्याबाबत स्वतंत्ररित्या कार्यवाही करण्यात येत आहे.

नगरपरिषद राज्यस्तरीय पदांकरीता आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात आल्याच्या अनुषंगाने या नगरपरिषद राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांच्याकरीता बदल्या संबंधीचे धोरण निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त नमुद करण्यात आलेल्या पार्श्वभूमीवर नगरपरिषद राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्यासंबंधी पुढीलप्रमाणे धोरण विहीत करण्यात येत आहे:-

(१) राज्यस्तरीय संवर्गातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी म्हणून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना घोषित करण्यात येत आहे.

(२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर धोरणानुसार सन २०१७ च्या सर्वसाधारण नियतकालीक बदल्यांपासून कार्यवाही करावी.

(३) राज्यस्तरीय संवर्गातील पदांवरील अधिकारी / कर्मचारी हे राज्यस्तरीय संवर्गात कार्यरत असल्याने, ते संपूर्ण राज्यात बदलीस पात्र असतील.

(४) राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्याची एका नगरपरिषदेत ३ वर्षाचा कार्यकाळ पूर्ण झाल्यानंतर त्यांची बदली करण्यात यावी. संबंधित अधिकाऱ्यांस / कर्मचाऱ्यास कोणत्याही परिस्थितीत एका नगरपरिषद / नगरपंचायतींमध्ये ४ वर्षापेक्षा जास्त कालावधीकरीता ठेवता येणार नाही.

(५) राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी /कर्मचारी यास एकाच जिल्ह्यात २ पदावधी पेक्षा (६ वर्षापेक्षा) जास्त कालावधीसाठी ठेवता येणार नाही.

(६) राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांची पदोन्नतीने नेमणूक करताना सामान्य प्रशासन विभागाच्या महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५ चा अवलंब करण्यात यावा.

(७) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय यांनी बदली अधिनियम, २००५ मधील तरतुदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्यांबाबत वरील विहीत करण्यात आलेल्या धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०५१२१५५५४९५५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.12 16:21:50 +05'30'

(ज.ना.पाटील)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व नगरपरिषद / नगरपंचायत.